आर्थिक वर्षाच्या अखेरीस खरेदीच्या प्रस्तावांबाबत करावयाची कार्यवाही.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र.- संकीर्ण १०००/प्र.क्र.१४/भाग-१/कोषा.प्रशा.५**
**मादाम काम मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
तारीख: ०९ मार्च, २०१५.

**संदर्भ** :- १) शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण १०९४/ प्र.क्र.७६ /कोषा प्र.४, दि.१४ जुलै १९९४
२) शासन परिपत्रक क्रमांक: संकीर्ण १०००/ प्र.क्र.१४/कोषा प्र.४, दि.११ फेब्रुवारी २०००.

**शासन परिपत्रक**

सन १९९९-२००० या आर्थिक वर्षापासुन "१५ फेब्रुवारी, अथवा तद्नंतर सर्व प्रशासकीय विभागांनी तसेच त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील विभागीय कार्यालयांनी / प्रादेशिक कार्यालयांनी यंत्रसामग्री, उपकरणे नवीन मोटार वाहने, नवीन फर्निचर, नवीन झेरॉक्स मशीन, नवीन संगणक अथवा त्याचे सुटे भाग यांच्या खरेदीच्या प्रस्तावांना मंजूरी देऊ नये. त्याच प्रमाणे विद्यमान फर्निचरची दुरुस्ती , झेरॉक्स मशीन, संगणक, उपकरणे अथवा त्यांचे सुटे भाग यांच्या दुरुस्तीचे प्रस्ताव, नैमित्तिक कार्यशाळा, सेमिनार व भाडयाने कार्यालय घेण्याचे प्रस्ताव इत्यादी बाबींचे प्रस्ताव अशा प्रकारच्या प्रस्तावांना मंजूरी देऊ नये. ते आदेश शासकीय महामंडळे, अनुदानित संस्था, इत्यादी सकट सर्व घटकांना लागू राहतील," अशा सूचना निर्गमित केल्या आहेत

त्यामुळे या वर्षीही दि. १५ फेब्रुवारी २०१५ नंतर आलेल्या कोणत्याही खरेदी प्रस्तावास मान्यता दिली जाणार नाही व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी कोणत्याही स्तरावर दि.१५ फेब्रुवारी २०१५ नंतर अशा प्रकारच्या खरेदीचे प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेकरिता सादर करु येऊ नये तसेच मंजूरीही देण्यात येऊ नये.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०९११५३०८४७०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NARAYAN BHASKAR RINGANE
Digitally signed by NARAYAN BHASKAR RINGANE
DN: CN = NARAYAN BHASKAR RINGANE, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Finance Department
Date: 2015.03.10 14:10:05 +05'30'

**ना. भा. रिंगणे**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२.सर्व सन्मानिय विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य,

३.राज्यपालांचे सचिव
४.मुख्यमंत्र्यांचे सचिव
५.सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७.मंत्रालयीन सर्व विभागांच्या अधिन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
८.प्रबंधक, मुळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९.प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११.महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१४.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१
१५.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७.सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८.प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२.सर्व विभागीय आयुक्त
२३.सर्व जिल्हाधिकारी
२४.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२५.संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई
२६.अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
२७.सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/ अमरावती
२८.मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
२९.सहसंचालक,स्थानिक निधी लेखा मुंबई /पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
३०.वित्त विभागातील सर्व कार्यासने
३१.निवड नस्ती कोषा प्र.५